श्री. उदयसिंह रंगराव पाटील, निलंबनाधिन मोटार वाहन निरीक्षक यांना शासन सेवेत पुन:स्थापित केल्यानंतर पदस्थापना देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक: एमव्हीडी-०३२३/प्र.क्र.११४/परि-३**
२ रा मजला,मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : २८ मे, २०२५.**

वाचा : १) गृह विभाग, शासन आदेश क्रमांक: एमव्हीडी-०७२४/प्र.क्र.२६१/परि-४, दि. ०९.०७.२०२४.
२) गृह विभाग, शासन ज्ञापन क्रमांक: एमव्हीडी-०७२४/प्र.क्र.२६१/परि-४, दि. २४.०२.२०२५.

**आदेश**

ज्याअर्थी, श्री. उदयसिंह रंगराव पाटील, मोटार वाहन निरीक्षक हे प्रादेशिक परिवहन कार्यालय, नागपूर (ग्रामीण) येथे कार्यरत असताना त्यांनी वाहनांच्या पुनर्नोंदणीमध्ये केलेल्या अनियमिततेमुळे शासकीय कामकाजाप्रती कर्तव्य परायणता व सचोटी राखलेली नाही. त्यामुळे त्यांना दिनांक ०९.०७.२०२४ च्या शासन आदेशान्वये निलंबित करण्यात आले होते;

आणि ज्याअर्थी, श्री. उदयसिंह रंगराव पाटील (निलंबित), मोटार वाहन निरीक्षक यांच्याविरुध्द शासन ज्ञापन दिनांक २४.०२.२०२५ अन्वये विभागीय चौकशी सुरु करण्यात आली आहे;

आणि ज्याअर्थी, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक १४.१०.२०११ व दिनांक ०९.०७.२०१९ मधील तरतुदीनुसार श्री. उदयसिंह रंगराव पाटील (निलंबित) मोटार वाहन निरीक्षक यांच्या निलंबनाचा आढावा घेण्यात आला. निलंबन आढावा समितीने केलेल्या शिफारशीनुसार श्री. उदयसिंह रंगराव पाटील (निलंबित), मोटार वाहन निरीक्षक यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे;

त्याअर्थी श्री. उदयसिंह रंगराव पाटील, निलंबनाधिन मोटार वाहन निरीक्षक यांना या आदेशान्वये शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात येत असून त्यांना प्रादेशिक परिवहन कार्यालय, अमरावती येथे अकार्यकारी स्वरुपाची कामे असलेल्या रिक्त पदावर पदस्थापना देण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२८१४३७०४१८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

JAYSEN
JAYPRAKASH
INGOLE

Digitally signed by JAYSEN JAYPRAKASH INGOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=fac1868a3a3bc62404072a90fb604cfa54cc0c6b396bbe9f862cb814602e0bfd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7C9E48AC69F313DEECCD6E9EECEEA57A822C9D8CCACD64DD1C5031B045E7C1F2, cn=JAYSEN JAYPRAKASH INGOLE
Date: 2025.05.28 16:06:34 +05'30'

**(जयसेन इंगोले)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता अग्रेषित. (दोन जादा प्रतींसह)
२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
३) प्रादेशिक परिवहन अधिकारी, प्रादेशिक परिवहन कार्यालय, नागपूर (ग्रामीण).
४) प्रादेशिक परिवहन कार्यालय, अमरावती .
५) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
६) श्री. उदयसिंह रंगराव पाटील, मोटार वाहन निरीक्षक (परिवहन आयुक्त यांच्यामार्फत)
७) अवर सचिव, परि-४.
८) निवडनस्ती, परि-३.